**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत "उप संचालक, गट-अ व सहायक संचालक, गट-ब" या पदावर रुजू होण्यास मुदतवाढ देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : औसुवआ ०३२४/प्र.क्र.३९/काम.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९.०८.२०२४

**संदर्भ :** १) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाचा शासन आदेश क्र.औसुवआ९२३/प्र.क्र.१४९/काम.१,दि.११.०७.२०२४.
२) उद्योग, ऊर्जा, कामगार व ख निकर्म विभागाचा शासन आदेश क्र.औसुवआ०९२३/प्र.क्र.१४८/काम.१,दि.१८.०७.२०२४.
३) सामान्य प्रशासन विभागाचे दि.२८/५/२०१८ व दि.२६/९/२०१८ रोजीचे शासन निर्णय.

**प्रस्तावना:-**

शासनाने दि.११.०७.२०२४ व दि. १८.०७.२०२४ रोजी आदेशाव्दारे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवर अनुक्रमे १ उप संचालक, गट-अ व ५ सहायक संचालक, गट-ब या संवर्गातील एकुण ६ उमेदवारांना पदस्थापनेच्या ठिकाणी १ महिन्यामध्ये रुजू होण्याबाबत कळविले होते. सदरहू आदेशानुसार सदर उमेदवारांनी आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नियुक्ती स्विकारणे आवश्यक आहे.

२. तथापि, त्यापैकी काही उमेदवारांनी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भीय क्र.३ येथील शासन निर्णयाव्दारे विहित केलेल्या तरतुदीनुसार पदस्थापनेच्या ठिकाणी/कार्यालयामध्ये रुजू होण्याकरीता मुदतवाढ मिळणेबाबत शासनास विनंती केली आहे. यानुषंगाने सदरहू उमेदवारांना नियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील पुढील "उप संचालक,गट-अ" व "सहायक संचालक, गट-ब" या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नांवापुढे (स्तंभ-४) मध्ये नमूद कालावधीकरीता मुदतवाढ, या शासन निर्णयाव्दारे देण्यात येत आहे.

| अ क्र | उमेदवारांचे नांव व पदनाम, | संदर्भीय क्र १.येथील शासन निर्णयाव्दारे दिलेले पदस्थापनेचे ठिकाण | रूजू होण्याकरीता मुदतवाढ |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **उप संचालक,गट-अ** | | | |
| १ | श्री. सुप्रिया सुरेश कोरके, उप संचालक, गट-अ, | ठाणे | २ महिना मुदतवाढ |
| **सहायक संचालक,गट-ब** | | | |
| **अ क्र** | **उमेदवारांचे नांव व पदनाम,** | **संदर्भीय क्र २.येथील शासन निर्णयाव्दारे दिलेले पदस्थापनेचे ठिकाण** | **रूजू होण्याकरीता मुदतवाढ** |
| १. | श्री. नितीन बाळु सानप, सहायक संचालक, गट-ब | नाशिक | २ महिना मुदतवाढ |
| २. | श्री.किशोर रामलाल माठे, सहायक संचालक,गट-ब | पुणे (कार्यक्षेत्र.२) | २ महिना मुदतवाढ |
| ३. | श्रीम. श्रुती दामोधर जाधव, सहायक संचालक,गट-ब | कल्याण | २ महिना मुदतवाढ |

२. सदरहू उप संचालक,गट-अ व सहायक संचालक,गट-ब या संवार्गातील उपरोक्त अधिकाऱ्यांना देण्यात आलेल्या वाढीव मुदतीच्या कालावधीत नियुक्तीच्या ठिकाणी/कार्यालयामध्ये हजर न झाल्यास, त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. तसेच, सदर पदावर रूजू होण्यास देण्यात येत असलेल्या मुदतवाढीमुळे त्यांच्या ज्येष्ठतेबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ व प्रचलित नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद सबंधित उमेदवारांनी घ्यावी.

३. सदरहू शासन निर्णय तात्काळ अंमलात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०९१६३४३८९७१० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHILPA GIRISH CHAUDHARI

Digitally signed by SHILPA GIRISH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=c302cfaa4da0b2d72c4622c85421df78e53b25c22ce3da5d53104e3a7a72c8ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F91D4AFBD1E1BF5BE92C2964CCBA9768C05DC4A771EA96939883ABF6C9F5A37E, cn=SHILPA GIRISH CHAUDHARI
Date: 2024.08.09 16:50:11 +05'30'

**( शिल्पा चौधरी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. श्रीम. सुप्रिया सुरेश कोरके, उप संचालक, गट-अ,

२. श्री. नितीन बाळु सानप, सहायक संचालक, गट-ब

३. श्री.किशोर रामलाल माठे, सहायक संचालक,गट-ब

४. श्रीम. श्रुती दामोधर जाधव, सहायक संचालक,गट-ब

या शिफारसपात्र उमेदवारांना ई-मेल संदेशाद्वारे व संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचेमार्फत

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव

२. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक

३. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई

४. सर्व संबंधित सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय

५. महालेखापाल-१/२,लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

६. सर्व संबंधित संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य.

७. उपसचिव/ अवर सचिव (काम-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

८. निवड नस्ती (काम-१)